**महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो म. रा. मुंबई यांच्या आस्थापनेवरील २० अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एफपीबी ०७१९/प्र.क्र.३८५/पोल-४**
मादाम कामा रोड, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १४ ऑक्टोबर, २०१९.

**संदर्भ:**- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीआरए ०६१९/प्र.क्र.४६/पोल-४,दि.१८.०३.२०१९.
२) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांचे पत्र क्र. पोमसं/२६ब/ॲकब्यु/मुदतवाढ/ अस्थायी पदे/०६/२०१५, दि. ०६.०७.२०१९.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. क्रमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/१६/आपुक,दि.११.०९.२०१९

**शासन निर्णय** :-

महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील २० वाहन चालक अस्थायी पदांना उपरोक्त संदर्भ क्र.१ अन्वये दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०२० पर्यंत अटींच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यात आली होती. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये आता प्रशासकिय विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि. ०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत. उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयातील २० वाहन चालक या अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ पासून मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव अपर पोलीस महासंचालक (नि.व स.) कार्यालयामार्फत शासन मान्यतेसाठी सादर केलेला आहे. त्यानुसार,सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयातील एकूण २० वाहन चालक या अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ पासून दि. २९.०२.२०२० पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर मंजूरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाही व पदे ज्या कारणासाठी, अटी व शर्तीचे अधीन राहून मंजूर केली आहेत त्यांचे पालन करण्यात आले आहे.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/०२/२०१९ नुसार विहित केलेल्या अटींचे व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात येईल व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

३) मधल्या कालावधीपर्यत अस्थायी पदांच्या सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबतच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास व अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्त्यांचा प्रश्न निर्माण झाल्यास ती जबाबदारी महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

३. यासाठी होणारा खर्च गृह विभाग,मागणी क्रमांक बी-१ लेखाशिर्ष "२०५५-पोलीस- १०१(३) ॲन्टी करप्शन ब्युरो " या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग,शासन निर्णय क्र. क्रमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.०८/१६/ आपुक, दि.११.०९.२०१९ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१४१७२६३५५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Somnath Vasant Potare

Digitally signed by Somnath Vasant Potare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, serialNumber=17e9c3c1ef20b007fefc5a1f1ec0e69f061648d4f897d5822e9f0e56899502e0, cn=Somnath Vasant Potare
Date: 2019.10.14 17:29:37 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
४. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग (व्यय-७/वित्तीय सुधारणा-१),मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी (पोल-२/पोल-३),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती/ गृह विभाग (पोल-४).

**महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**
**गृह विभाग शासन निर्णय क्र.एमटीएस-०३१९/प्र.क्र.३८४/पोल-४, दि. १४.१०.२०१९ सोबतचे विवरणपत्र**

| अ. क्र. | पदनाम | पद संख्या | पद निर्मितीचा शासन निर्णय | अस्थायी पदांना मुदतवाढ मिळाल्याचा शासन निर्णय |
|---|---|---|---|---|
| १ | **पोलीस शिपाई वाहन चालक** | ८ | एमटीएस-१०९२/४३०/(२९)/पोल-४, दि.०८.०७.१९९३ | सीआरए-०६१९/प्र.क्र.४६/पोल-४, दिनांक १८/०३/२०१९. |
| २ | **पोलीस शिपाई वाहन चालक** | ६ | एमटीएस-१०९३/२४००/(२५)/पोल-४, दि.१२.०९.१९९५ | |
| ३ | **पोलीस शिपाई वाहन चालक** | ६ | एमटीएस-१०९६/२७२३/न.बा.१८/पोल-४, दि.०१.०८.१९९७ | |
| | **एकूण** | **२०** | | |